**अमृत संस्थेकरीता सन २०२३- २४ या आर्थिक वर्षाकरीता ३१ सहायक अनुदाने (वेतनेत्तर) अंतर्गत मंजूर करण्यात आलेला निधी वितरित करण्याबाबत......**

**महाराष्ट्र शासन**
**इतर मागास बहुजन कल्याण विभाग**
**शासन ज्ञापन क्र. अमृत-२०२३/प्र.क्र.५४/संस्था**
इतर मागास बहुजन कल्याण विभाग ,
मादाम कामा रोड, हुतात्मा राज गुरु चौक,
मंत्रालय मुंबई-३२
दि. ११.०८.२०२३

संदर्भ :- १. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थस- २०२३/प्र.क्र. ४०/अर्थ-३, दि. १२/०४/२०२३
२. शासन ज्ञापन क्र. अमृत-२०२३/प्र.क्र.५४/ संस्था, दि. ०९/०६/२०२३

ज्ञापन :- सन २०२३-२४ या आर्थिक वर्षाकरीता महाराष्ट्र संशोधन उन्नती व प्रशिक्षण प्रबोधीनी (अमृत्त), पुणे या संस्थेकरीता ३१ सहायक अनुदाने (वेतनेत्तर) या उद्दिष्टांतर्गत रु. ४८.०० कोटी इतका निधी अर्थसंकल्पीत करण्यात आलेला आहे.

२. वित्त विभागाने संदर्भाधीन दि. १२/०४/२०२३ शासन परिपत्रकान्वये २० टक्के निधी अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर उपलब्ध करून दिलेला आहे. त्यानुसार संदर्भ क्र. २ अन्वये रु. ४.८० कोटी इतका निधी वितरीत करण्यात आला आहे. उर्वरित रु. ४.८० कोटी ( अक्षरी रुपये चार कोटी ऐंशी लक्ष फक्त) इतका निधी वितरित करण्यास याद्वारे शासन मान्यता देण्यात येत आहे.

३. सदर निधी सन २०२३-२४ या आर्थिक वर्षातील उपलब्ध तरतुदीतून, मागणी क्र. झेडजी २२२५- अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती, इतर मागास वर्ग व अल्पसंख्याक यांचे कल्याण (०१) (१०) महाराष्ट्र संशोधन उन्नती व प्रशिक्षण प्रबोधिनी (अमृत) (कार्यक्रम), ३१ सहायक अनुदान (वेतनेत्तर) (२२२५ एफ ५३२) या लेखाशीर्षाखालील तरतुदीतुन खर्च करण्यात यावा.

४. सदर निधी वितरीत करण्यासाठी नियंत्रक अधिकारी म्हणून उप सचिव (संस्था) यांना व लेखाधिकारी (रोखशाखा) यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

५. वित्तीय नियमावली व महाराष्ट्र अर्थ नियमावली पुस्तिकानुसार वित्त विभागाने निर्गमित केलेल्या अटी व शर्तीनुसार सदर निधी खर्च करताना कोणतीही वित्तीय अनियमितता होणार नाही याची दक्षता घेण्याची, तसेच सदर खर्च केल्यानंतर उपयोगिता प्रमाणपत्र (Utilisation) Certificate) वेळोवेळी शासनास सादर करण्याची जबाबदारी ही व्यवस्थापकीय संचालक, अमृत यांची राहील.

६. सदर ज्ञापन वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि. १२/०४/२०२३ शासन परिपत्रकान्वये दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०८१११४१६४९०९३४ असा आहे. हा शासन आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by DINESH ROHIDAS CHAVAN
Date: 2023.08.11 14:18:46 +05'30'

**( दिनेश चव्हाण )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत, माहिती व आवश्यक कार्यवाहीसाठी अग्रेषित:-**

१) मा. राज्यपालांचे सचिव, मलबार हिल, मुंबई.
२) मा. मुख्यमंत्री यांचे अप्पर मुख्य सचिव, मुंबई
३) मा. उपमुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मुंबई
४)मा. मंत्री/ राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५) मा. मुख्य सचिव यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
६) सर्व मंत्रालयीन विभागांचे अमुस/प्रधान सचिव / सचिव, मंत्रालय, मुंबई
७) अपर मुख्य सचिव, इतर मागास बहुजन कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहाय्यक
८) व्यवस्थापकीय संचालक, अमृत, पुणे
९) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)- १ / २ महाराष्ट्र, मुंबई/ नागपूर
१०) उप सचिव (अर्थसंकल्प), इतर मागास बहुजन कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई
११) लेखाधिकारी (रोखशाखा) / कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प), इतर मागास बहुजन कल्याण विभाग,मंत्रालय, मुंबई
१२) निवडनस्ती.